**डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार आणि डॉ. एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्कार सन २०२२-२३ वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.मराग्रं-२०२४/प्र.क्र.१०८/ई-८११११११/ग्रं.क.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०५ ऑगस्ट, २०२४.

**वाचा :** १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र.मराग्रं-२०२२/प्र.क्र.६०/ग्रं.क., दि.१६.११.२०२३
२) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय,महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.३१/ पुरस्कार २२-२३/२०२४-२५/२८८३, दि.२६.०७.२०२४.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्रातील जनतेचे सामाजिक, शैक्षणिक व सांस्कृतिक जीवन समृद्ध करण्यासाठी व वाचन संस्कृती वृध्दींगत होण्यासाठी राज्यातील शासनमान्य सार्वजनिक ग्रंथालयांचे योगदान लाभावे, यासाठी ग्रंथालयांचा गुणात्मक विकास व्हावा, या ग्रंथालयांकडून राज्यातील जनतेला अधिक चांगल्या सेवा देण्यासाठी त्यांना प्रोत्साहन मिळावे या उद्देशाने शासनाकडून दरवर्षी उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालयांना डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना डॉ. एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्कार देवून त्यांना सन्मानित करण्यात येते. उक्त वाचा क्र. १ येथील शासन निर्णयाव्दारे सदर पुरस्काराबाबतच्या तरतुदी व निकष निश्चित करण्यात आले आहेत.

सन २०२२-२३ या वर्षासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना डॉ. एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्काराकरिता पुरस्कार्थींची निवड करण्यासाठी दि.२६.०७.२०२४ रोजी राज्य निवड समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. त्यामध्ये निवड झाल्यानुसार पुरस्कार जाहीर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२२-२३ या वर्षासाठी डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार आणि ग्रंथालय चळवळीतील कार्यकर्ते व सेवक यांना डॉ. एस. आर. रंगनाथन उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता व सेवक (ग्रंथमित्र) पुरस्कार खालीलप्रमाणे जाहीर करण्यात येत आहेत.:-

**(अ) डॉ. बाबासाहेब आंबेडकर उत्कृष्ट सार्वजनिक ग्रंथालय पुरस्कार**

**(१) शहरी विभाग :**

| अ.क्र. | ग्रंथालयाचे नाव व पत्ता | ग्रंथालयाचा दर्जा/ वर्ग | पुरस्काराची रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | हिंद नगर वाचनालय व ग्रंथालय, रहिमतपूर ता. कोरेगाव, जि. सातारा | अ | १,००,०००/- |
| २ | विवेकानंद सार्वजनिक वाचनालय, नांदुरा, श्री. शिवाजी महाराज पुतळयाजवळ, बुलढाणा रोड, नांदुरा जि. बुलढाणा | ब | ७५,०००/- |

**(२) ग्रामीण विभाग :**

| अ.क्र. | ग्रंथालयाचे नाव व पत्ता | ग्रंथालयाचा दर्जा/ वर्ग | पुरस्काराची रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | शहीद भगतसिंग वाचनालय, कुऱ्हा, मु.पो. कुऱ्हा ता. तिवसा जि. अमरावती | अ | १,००,०००/- |
| २ | संत गाडगेबाबा सार्वजनिक वाचनालय, भिडी ता. देवळी जि. वर्धा | ब | ७५,०००/- |
| ३ | कै. जयकुमारजी जैन सार्वजनिक वाचनालय, बोरी, ता. जिंतूर जि. परभणी | क | ५०,०००/- |
| ४ | कै. रघुनाथ रामचंद्र बुरांडे ग्रंथालय, बिरोबा मंदिराजवळ, कोडोली ता. पन्हाळा जि. कोल्हापूर | ड | २५,०००/- |

**(ब) डॉ. एस.आर. रंगनाथन् उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता (ग्रंथमित्र) पुरस्कार**

**(१) राज्यस्तरीय पुरस्कार :**

| | कार्यकर्त्याचे / सेवकाचे नाव व पत्ता | पुरस्काराची रक्कम रुपये |
|---|---|---|
| **राज्यस्तरीय ग्रंथालय कार्यकर्ता (ग्रंथमित्र)** | श्री. विनायक दत्तात्रय गोखले, अनंत आनंद को. ऑपरेटिव्ह हाऊसिंग सोसायटी, आनंद पार्क, ठाणे (प) मराठी ग्रंथसंग्रहालय, ठाणे | ५०,०००/- |
| **राज्यस्तरीय ग्रंथालय सेवक (ग्रंथमित्र)** | श्री. सुरेश बळीराम जोशी, ग्रंथपाल, विजय वाचनालय, ता. तुळजापुर जि. धाराशिव | ५०,०००/- |

**(२) डॉ. एस.आर. रंगनाथन् उत्कृष्ट ग्रंथालय कार्यकर्ता (ग्रंथमित्र) विभागस्तरीय पुरस्कार :**

| अ.क्र. | विभाग | पुरस्कार प्राप्त कार्यकर्त्यांचे नाव व पत्ता | पुरस्काराची रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | अमरावती | श्री. विनोद बाळकृष्ण मुंदे<br>श्री. सरस्वती सार्वजनिक वाचनालय, राजना पो. काजना ता. नांदगाव खंडे, जि. अमरावती | २५,०००/- |
| २ | छत्रपती संभाजीनगर | श्री. युवराज मोहनराव जाधव<br>लोकमान्य सार्वजनिक वाचनालय, शिवणी (खुर्द), पो. शिवणी (बु.), ता.जि. लातूर | २५,०००/ |
| ३ | नागपूर | श्री. धनराज देबीलाल रहांगडाले<br>श्री. शारदा वाचनालय, गोंदिया जि. गोंदिया | २५,०००/ |
| ४ | नाशिक | श्री. गोपीचंद जगन्नाथ पगारे<br>मातृभूमी प्रबोधन समिती संचलित महात्मा फुले सार्वजनिक वाचनालय व ग्रंथालय, जेल रोड, नाशिक जि. नाशिक | २५,०००/ |
| ५ | पुणे | श्रीमती ज्योत्स्ना चंद्रशेखर कोल्हटकर<br>श्री छत्रपती प्रतापसिंह महाराज (थोरले) नगर वाचनालय, भवानी पेठ, सातारा जि. सातारा | २५,०००/ |
| ६ | मुंबई | श्री. अनंत आपाजी वैद्य<br>रा. ब. अनंत शिवाजी देसाई वाचनालय आणि ग्रंथसंग्रहालय, कुडाळ, जि. सिंधुदुर्ग | २५,०००/ |

**(३) डॉ. एस. आर. रंगनाथन् उत्कृष्ट ग्रंथालय सेवक (ग्रंथमित्र) विभागस्तरीय पुरस्कार :**

| अ. क्र. | विभाग | पुरस्कार प्राप्त सेवकांचे नाव व पत्ता | पुरस्काराची रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | अमरावती | श्रीमती ज्योती रामदास सरदार (धबाले), ग्रंथपाल<br>साने गुरुजी वाचनालय, जठार पेठ, अकोला, जि. अकोला | २५,०००/- |
| २ | छत्रपती संभाजीनगर | श्री. गणेश रामभाऊ शेंडगे, ग्रंथपाल<br>ए. एच. वाडिया सार्वजनिक वाचनालय, ता. जि. बीड | २५,०००/ |
| ३ | नागपुर | श्री. नंदू दामोदर बनसोड, ग्रंथपाल<br>दादासाहेब निकम सार्वजनिक वाचनालय, महाल, ता.जि. नागपूर | २५,०००/ |
| ४ | नाशिक | श्री. अमोल संभाजी इथापे, ग्रंथपाल<br>अहमदनगर जिल्हा वाचनालय, चितळे रोड, अहमदनगर जि. अहमदनगर | २५,०००/ |
| ५ | पुणे | श्री. भगवान पांडुरंग शेवडे, ग्रंथपाल<br>श्री शिवाजी सार्वजनिक वाचनालय, मांगले, ता.शिराळा, जि. सांगली | २५,०००/ |
| ६ | मुंबई | श्रीमती मंजिरी अनिल वैद्य, ग्रंथपाल<br>श्रीधर वासुदेव फाटक ग्रंथसंग्रहालय, विलेपार्ले (पूर्व) मुंबई. | २५,०००/ |

०२. उपरोक्त पुरस्कार्थींना त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेली रोख रक्कम, सन्मान चिन्ह, प्रमाणपत्र आणि ग्रंथभेट देऊन सन्मानित करण्यात येईल. तसेच, सदर पुरस्कार चारित्र पडताळणीच्या अधीन राहून घोषित करण्यात येत आहेत.

०३. उपरोक्त पुरस्कार वितरण सोहळा आयोजित करण्याबाबतची पुढील कार्यवाही ग्रंथालय संचालक यांनी त्वरीत करावी.

०४. सदर खर्च मागणी क्र.डब्ल्यू-४, २२०५, कला व संस्कृती, १०५, सार्वजनिक ग्रंथालये, (०१) ग्रंथालय संचालनालय, (०१) (०१) ग्रंथालय संचालनालय, लेखाशीर्ष २२०५ ०२५१, उद्दीष्टशीर्ष ०५ बक्षीसे या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ वर्षामधील उपलब्ध निधीमधून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०८०५१४१३१३४८०८ असा आहेहा आदेश डिजीटल स्वाक्षरीने . साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRATAP PANDURANG LUBAL

Digitally signed by PRATAP PANDURANG LUBAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=b0d6763338fc6cc4f7cf07ca60db7abc1cfac99c84ab1b5bfc0dae4609d631d0,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=AF6895C47A84066432F5BDD1F182B4163D880AC9BD8D24A198FD0E7310BBEB59, cn=PRATAP PANDURANG LUBAL
Date: 2024.08.05 14:47:18 +05'30'

**( प्रताप पां.लुबाळ )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री ( उच्च व तंत्र शिक्षण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव ( उच्च व तंत्र शिक्षण ), मंत्रालय, मुंबई.
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई (व्यापक प्रसिद्धीसाठी)
९. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र, मुंबई
१०. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११. सर्व सहाय्यक ग्रंथालय संचालक / जिल्हा ग्रंथालय अधिकारी/ जिल्हा ग्रंथपाल.(ग्रंथालय संचालनालयामार्फत)
१२. अवर सचिव ( अर्थसंकल्प कक्ष ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती ( ग्रं.क.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.